| | |
|---|---|
| Convertion in Regular Temparary Establishment :- Shri Udhhawaro Punjaram Bawane and other 4 workers working under Superintending Engineer Nagpur Irrigation Circle,Nagpur. | अधीक्षक अभियंता, नागपूर पाटबंधारे मंडळ,नागपूर यांच्या अधिपत्याखालील सर्वश्री उध्दव पुंजाराम बावणे व इतर ४ मजूर यांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबत. |

महाराष्ट्र शासन,
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक एसयुटी २०१०/(४४/२०१०)/आ(कामगार)
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- २३/०३/२०११

पहावे :-१) अधीक्षक अभियंता,नागपूर पाटबंधारे मंडळ,नागपूर यांचे पत्र क्रमांक १६१५ / सा-३/२०१०, दिनांक १५.४.२०१०.
२) शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक रुअआ १५९६/२२८/सेवा-५, दिनांक २४.४.२००१.

**<u>प्रस्तावना :-</u>**

सर्वश्री. उध्दव पुंजाराम बावणे, आनंद पांडुरंग मेश्राम, रघुनाथ सुकरु परचाके, निळकंठ सदाशिव जुनघरे व परसराम गणपत गुलबे यांना अमलनाला प्रकल्पावर अनुक्रमे दि.१२.९.१९८४, दि.९.९.१९८४, दि.१.१२.१९८३, दि.२४.११.१९८३ व दि.१.९.१९८४ पासून अकुशल हलका मजूर म्हणून रोजंदारी आस्थापनेवर घेण्यात आले होते. सदर कामगारांना रितसर नोटीस देऊन दि.३०.१०.१९८६ पासून कामावरुन कमी करण्यात आले. त्यामुळे त्यांनी मा.कामगार न्यायालय, चंद्रपूर येथे दावा क्र.७४,७६,७७,७९ व ८१/९० दाखल केले. त्यास अनुसरुन सदर कामगारांना सेवासातत्यासह सेवेत पुनर्स्थापित करावे व मागील पगाराची संपुर्ण थकबाकी दयावी, असे आदेश मा.कामगार न्यायालयाने अनुक्रमे दि.१६.९.१९९८, दि.१८.९.१९९८,दि.१९.९.१९९८, दि.२१.९.१९९८ व दि.२२.९.१९९८ रोजी दिले.

मा.कामगार न्यायालयाच्या उपरोक्त निर्णयाविरुध्द शासनाच्यावतीने मा. औद्योगिक न्यायालय,चंद्रपूर येथे ५ पुनर्विलोकन अर्ज क्र.३७/९८ ते ४१/९८ दाखल करण्यात आले. त्यानुषंगाने सदर कामगारांना मागील थकबाकी न देता सेवासातत्यासह सेवेत पुनर्स्थापित करावे, असा निर्णय मा.औद्योगिक न्यायालयाने एकत्रितरित्या दि.२८.१०.२००४ रोजी दिला.

महामंडळाचे कायदे सल्लागार ॲड.गिल्डा यांच्या सल्ल्यानूसार मा.औद्योगिक न्यायालयाच्या उपरोक्त दि.२८.१०.२००४ च्या निर्णयाविरुध्द शासनाच्यावतीने मा.उच्च न्यायालय,नागपूर येथे रिट पिटीशन क्र.६६४० ते ६६४४/२००५ दाखल करण्यात आले. सदर रिट पिटीशन्स मा.उच्च न्यायालयाने दि.४.५.२००७ रोजी फेटाळली. सदर निर्णयाविरुध्द अपिलात जाण्याचा सल्ला महामंडळाचे कायदे सल्लागार ॲड.गिल्डा यांनी दि.६.६.२००७ च्या पत्रान्वये दिला. त्यास अनुसरुन अपिलात जाण्याचा प्रस्ताव अभिप्रायार्थ सहसचिव, विधी

कृ.मा.पा.

व न्याय विभाग, नागपूर यांना जुलै २००७ मध्ये सादर करण्यात आला होता. त्यास अनुसरुन प्रस्तुत न्यायालयीन प्रकरणी महामंडळाच्या कायदेसल्लागारांच्या सल्ल्यानूसार रिट पिटीशन्स दाखल केलेली आहेत. त्यामुळे या प्रकरणी महामंडळाच्या वकीलांच्या सल्ल्यानूसार कार्यवाही करावी व याप्रकरणी विधी व न्याय विभागाने सल्ला देण्याचा प्रश्न उदभवत नाही, असे अभिप्राय सदर विभागाने जुलै २००७ मध्ये दिले. त्यास अनुसरुन महामंडळाच्या कायदेसल्ल्यानूसार अपिलाची कार्यवाही करण्याबाबत क्षेत्रिय कार्यालयास कळविण्यात आले.

तदनंतर मा.उच्च न्यायालय, नागपूर यांच्या उपरोक्त दि.४.५.२००७ च्या निर्णयाविरुध्द मा.उच्च न्यायालय, नागपूर येथे शासनाच्यावतीने दाखल केलेली एल.पी.ए. दि.२.४.२००८ रोजी फेटाळली. सदर निर्णयाविरुध्द अपिल दाखल करण्यासंदर्भात महामंडळाचे कायदेसल्लागार ॲड.गिल्डा यांचे अभिप्राय मागविले असता वारंवार पत्रव्यवहार करुनही त्यांच्याकडून अभिप्राय प्राप्त झाले नसल्याने महामंडळाच्या पॅनेलवरील अधिवक्ता श्री.पळशीकर यांचे अभिप्राय क्षेत्रिय कार्यालयाने सादर केले. त्यामध्ये मा.औद्योगिक न्यायालयाच्या निर्णयानूसार कामगारांना थकबाकी न देता कामावर घ्यावे म्हणजेच अपील दाखल करु नये, असा सल्ला त्यांनी दि.७.७.२००८ रोजी दिला आहे.

शासनाच्यावतीने महामंडळाने दाखल केलेले एल.पी.ए. दि.२.४.२००८ रोजी फेटाळले. ही बाब सचिव समितीच्या निदर्शनास आणून कामगारांना दि.०६.०८.२००८ रोजीच्या सचिव समितीच्या मान्यतेने सर्वश्री. उध्दव पुंजाराम बावणे, आनंद पांडुरंग मेश्राम, रघुनाथ सुकरु परचाके, परसराम गणपत गुलबे व निळकंठ सदाशिव जुनघरे यांना मागील वेतनाची थकबाकी न देता अनुक्रमे १२.९.१९८४, दि.९.९.१९८४, दि.१.१२.१९८३, दि.२४.११.८३. व दि.१.१.१९८४ पासून सेवासातत्यासह अकुशल हलका मजुर या पदी रोजंदारी आस्थापनेवर शासनाच्या दि.०४.०९.२००८ च्या पत्रान्वये पुन:स्थपित करण्यास मान्यता देण्यात आली आहे व त्यानुसार सप्टें.२००८ मध्ये त्यांना प्रत्यक्षपणे पुन:स्थापित करण्यात आले आहे. दरम्यान दि.२१.०१.२००८ रोजी श्री.गुलबे यांचे निधन झाल्याने त्यांना पुन:स्थापित करण्यात आले नाही.

उपरोक्त नमुद कामगारांचे कामगार न्यायालय चंद्रपूर येथे, सेवासातत्य दिले त्या दिनांकापासून वेतनथकबाकी मिळणेबाबत प्रकरण क्र.५/२००९ अन्वये प्रकरण न्यायप्रविष्ठ होते. सदर न्यायालयीन प्रकरण कामगारांनी मागे घेतल्यामुळे मा. न्यायालयाने सदर प्रकरण दिनांक ०४.०३.२०१० ला खारीज केले. आता न्यायालयात कोणताही दावा प्रलंबित नाही.

तदनंतर संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक १५.४.२०१० च्या पत्रान्वये क्षेत्रिय कार्यालयाने यांना सर्वश्री उध्दव पुंजाराम बावणे, आनंद पांडुरंग मेश्राम, रघुनाथ सुकरु परचाके, परसराम गणपत गुलबे व निळकंठ सदाशिव जुनघरे यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा प्रस्ताव सादर केला आहे. सदर कामगारांना न्यायालयीन निर्णयानुसार व सचिव समितीच्या मान्यतेने सेवेत पुन:स्थापित केलेले आहे. शिवाय त्यांचे आता कोणतेही न्यायालयीन प्रकरण प्रलंबित नाही. सदर कामगार हे शासन निर्णय, सा.बां.वि.,दि.२४.४.२००१ च्या परि. १(१),(२) व २(अ) मधील अटीची पुर्तता करतात. त्यामुळे त्यांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

अधीक्षक अभियंता, नागपूर पाटबंधारे मंडळ,नागपूर यांच्या अधिपत्याखालील सर्वश्री उध्दव पुंजाराम बावणे व इतर ४ मजूर यांना मजूर पदी अस्थायी आस्थापोवर रुपांतरीत करण्यास खालीलप्रमाणे शासन मंजूरी देत आहे.

| अ.क्र. | कर्मचा-यांचे नांव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रु.अ.आ.वर आणवयाचे दिनांक | रु.अ.आ. वर घ्यावयाचे पद | वेतानश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री.उध्दव पूंजाराम बावणे | रोजंदारी | १२.०९.१९८४ | १२.०९.१९८९ | मजूर | रु.७५०-९४०(जुनी) २५००-३२००(५ वा वेतन आयोग) |
| २ | श्री.आनंद पांडूरंग मेश्राम | रोजंदारी | ०९.०९.१९८४ | ०९.०९.१९८९ | मजूर | रु.७५०-९४०(जुनी) २५००-३२००(५ वा वेतन आयोग) |
| ३ | श्री.रघूनाथ सुकरु परचाके | रोजंदारी | ०१.१२.१९८३ | ०१.१२.१९८८ | मजूर | रु.७५०-९४०(जुनी) २५००-३२००(५ वा वेतन आयोग |
| ४ | श्री.निलकंठ सदाशिव जूनघरे | रोजंदारी | ०१.०१.१९८४ | ०१.०१.१९८९ | मजूर | रु.७५०-९४०(जुनी) २५००-३२००(५ वा वेतन आयोग) |
| ५ | श्री.परसराम गणपत गुलबे (मयत) | रोजंदारी | २४.११.१९८३ | २४.११.१९८८ | मजूर | रु.७५०-९४०(जुनी) २५००-३२००(५ वा वेतन आयोग) |

२. सर्वश्री उध्दव पुंजाराम बावणे, आनंद पांडुरंग मेश्राम, रघुनाथ सुकरु परचके, निळकंठ सदाशिव जुनघरे व परसराम गणपत गुलबे यांना त्यांनी धारण केलेल्या पदांवर रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर रुपांतरीत धारण केलेल्या पदांकरिता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचा-यांच्या बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यात येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यांत येत आहे.

३. अधीक्षक अभियंता, नागपूर पाटबंधारे मंडळ,नागपूर यांनी या आदेशातील सर्व बाबी विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत,याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याचे आत निर्गमित करुन ते संबंधित

कृ.मा.पा.

कर्मचा-यांच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचा-यांचे नांव,पदनाम ,त्यांचा प्रथम नियुक्तीचा दिनांक व त्यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे तो दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिका-यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणावी. क्षेत्रिय अधिका-यांनी सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत. तसेच हे आदेश संबंधित कर्मचा-यांच्या व्यक्तीशः निदर्शनास आणावेत. शासनाने निर्गमित केलेल्या आदेशांच्या बाबतीत संबंधित कर्मचा-यांची (नांव,पदनाम,त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापोवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत) कोणतीही तक्रार नसल्यास त्याच्याकडून तशा आशयाचे प्रपत्र "ब" मधील दिलेल्या नमुन्यात हमीपत्र(Undertaking) घेवून ते त्या कर्मचा-यांच्या सेवापटात/सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपाल अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल,याबाबत संबंधीत अधीक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत/त्रुटी असल्याची संबंधित कर्मचा-यांची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव पाठवितांना संबंधित कर्मचा-यांच्या नेमणूकांच्या आदेशांच्या प्रती,नाममात्र हजेरी पटाच्या प्रती,आणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

४. सर्वश्री उध्दव पुंजाराम बावणे, आनंद पांडुरंग मेश्राम, रघुनाथ सुकरु परचाके व निळकंठ सदाशिव जुनघरे यांना प्रत्यक्ष सेवेत घेतल्याच्या दिनांकापासून म्हणजेच सप्टेंबर २००८ पासून थकबाकी देण्यात यावी. गुलबे व सदर ४ कामगारांच्या वेतनाची परिगणना त्यांना रुपांतरित अस्थायी आस्थापनेवर घेतल्याच्या दिनांकापासून करण्यात यावी.

५. दिनांक १.९.२००८ नंतर या आदेशाच्या दिनांकापर्यतच्या वेतनाच्या फरकाची रक्कम संबंधीत कर्मचा-यास रोखीने दयावयाची असून ती धनादेशाव्दारे (cheque) अदा करावयाची आहे.

६. या प्रस्तावावरील खर्च सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

७. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक रुअआ १५९६ / २२८ / सेवा-५, दिनांक २४ एप्रिल २००१ अवये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन काढण्यात येत आहेत.

८. हा शासन निर्णय www.maharashtra.gov.in हया संकेत स्थळावर २०११०३२३१११२३०३००१ हया संकेत क्रमांकावर प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सहपत्र :- **प्रपत्र- ब**

अ.अ.कोदे

( अ.अ.कोदे)
उपसचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :-

महालेखापाल,लेखा व अनुज्ञेयता,महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२,नागपूर
महालेखापाल,लेखा परिक्षा ,महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२,नागपूर
वित्त विभाग(व्यय १२), मंत्रालय,मुंबई
अधीक्षक अभियंता,नागपूर पाटबंधारे मंडळ,नागपूर
कार्यकारी अभियंता, चंद्रपूर मध्यम प्रकल्प विभाग क्र.१,चंद्रपूर
आस्थापना(कामगार)संग्रहार्थ.